वनपरिक्षेत्र अधिकारी (वन्यजीव),पवनी व वनपरिक्षेत्र अधिकारी (वन्यजीव),नागलवाडी यांना "आहरण व संवितरण अधिकारी" म्हणून घोषित करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : एफडीएम - २०१५/प्र.क्र.१५५/फ-२**
**मादाम कामा रोड,हूतात्मा राजगुरू चौक,**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,**
**दिनांक : १७.०७.२०१५**

वाचा :- १) वित्त विभाग, शासन निर्णय, क्रमांक-मकोनि-१०००/प्र.क्र.४४/०५,कोषा- प्र.५, दि.०४.०१.२००६

२) महसूल व वन विभाग, शासन निर्णय, क्र. डब्ल्यूएलपी-०६१४/प्र.क्र.१५२/फ-१ दि.०८/०७/२०१४

३) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र.क्र. कक्ष-२ (१)/असं/प्र.क्र.१५/भाग-३/२५/२०१५-१६, दि. ३०.०४.२०१५.

**प्रस्तावना -**

शासनाच्या वन विभागाच्या क्षेत्रिय कार्यालयातील कर्मचाऱ्यांची वेतन व भत्यांची देयके फेब्रुवारी-२००६ पासून इतर विभागाच्या कर्मचाऱ्यांप्रमाणेच कोषागारातून पारित करण्याबाबत वित्त विभागाच्या संदर्भ क्र.१ वरील दि.०४.०१.२००६ च्या शासन निर्णयान्वये निर्णय घेण्यात आला आहे. यानुसार महाराष्ट्र कोषागार नियम १९६८, खंड-१ मधील नियम १३ नुसार व नियम १५ (३) नुसार विभागातील आहरण व संवितरण अधिकाऱ्यांची यादी महालेखापाल कार्यालयाकडे पाठविण्यात येते. यानुसार वेळोवेळी निर्गमीत केलेल्या शासन निर्णयानुसार विभागातील आहरण व संवितरण आधिकाऱ्यांच्या याद्या प्रसिध्द करण्यात आल्या आहेत.

महसूल व वन विभाग,शासन निर्णय, क्र. डब्ल्यूएलपी-०६१४/प्र.क्र.१५२/फ-१ दि.०८/०७/२०१४ अन्वये पेंच व्याघ्र प्रकल्पाचे बफर क्षेत्र अधिसूचित करण्यात आले आहे.राष्ट्रीय व्याघ्र संवर्धन प्राधिकरण यांच्या मार्गदर्शक तत्वानुसार व्याघ्र प्रकल्पाच्या बफर क्षेत्राचे एकसंघ नियंत्रण (Unified Control) पेंच व्याघ्र प्रकल्प,नागपूर यांच्या नियंत्रणाखाली येत आहे.एकसंघ नियंत्रणामध्ये (Unified Control) दोन नविन वनपरिक्षेत्र निर्माण करण्यात आलेले असुन सदर पदनामास आहरण व संवितरण अधिकारी म्हणून नामनिर्देशित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय -**

अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपुर यांनी दि.३०.०४.२०१५ च्या पत्रान्वये प्रस्तावीत केल्याप्रमाणे खालील वन परिक्षेत्र अधिकारी यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषीत करण्यात येत आहे:-

| अ.क्र | आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करावयाचे पदनाम | मुख्यालय | जिल्हा व मुख्य कोषागार ठिकाण | जवळचे उपकोषागार कार्यालय |
|---|---|---|---|---|
| १. | वनपरिक्षेत्र अधिकारी (वन्यजीव), पवनी | पवनी | नागपूर | उपकोषागार,कार्यालय, रामटेक,जि.नागपूर |
| २. | वनपरिक्षेत्र अधिकारी (वन्यजीव),नागलवाडी | नागलवाडी | नागपूर | उपकोषागार कार्यालय, पारशिवनी,जि.नागपूर |

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असुन त्याचा संकेतांक २०१५०७१७१११७३४७२१९ असा आहे.हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Dattatraye Laxman Thorat

Digitally signed by Dattatraye Laxman Thorat
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Joint Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Dattatraye Laxman Thorat
Date: 2015.07.17 11:20:08 +05'30'

**डी.एल.थोरात**
सह सचिव
महसूल व वन विभाग.

**प्रति :-**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक, (वन्यजीव),महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२.अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३.अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव) पूर्व, महाराष्ट्र राज्य,नागपूर.
४. मुख्य वनसंरक्षक तथा क्षेत्रसंचालक,पेंच व्याघ्र प्रकल्प, महाराष्ट्र राज्य ,नागपूर.
५.उपसंचालक,पेंच व्याघ्र प्रकल्प,रामटेक,नागपूर.
६.जिल्हा कोषागार अधिकारी, पवनी/नागलवाडी,नागपूर.
७.उपकोषागार कार्यालय,रामटेक/पारशिवनी,जि.नागपूर.
८.वित्त विभाग, कार्यासन कोषा. प्र-५, मंत्रालय, मुंबई.
९.महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरिक्षा),मुंबई/नागपूर.
१०. निवड नस्ती (फ-२), महसूल व वन विभाग.